2005/2011100

तात्काळ

राज्य शासकीय कर्मचाऱ्यांचा
दिनांक २६ फेब्रुवारी, १९८६
रोजीचा नियोजित संप.

---

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
क्रमांक. एसटीके १०८६/४६५/सीआर-१५ / सोळा-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ फेब्रुवारी, १९८६

परिपत्रक

वाचा :- मुख्य सचिवांचे दिनांक १९.२.८६ चे सम क्रमांकाचे अर्धशासकीय पत्र

दिनांक २६ फेब्रुवारी, १९८६ रोजी होऊ घातलेल्या राज्य शासकीय / निमशासकीय कर्मचाऱ्यांच्या एक दिवसाचे लाक्षणिक संपाचे दिवशी शासकीय कामकाज सुरळीतपणे चालू राहण्याबाबत व्यवस्था करण्यासाठी सर्व मंत्रालयीन विभाग व इतर कार्यालयांना वर नमूद केलेल्या अर्ध शासकीय पत्राद्वारे सूचना देण्यात आल्या आहेत. सर्व मंत्रालयीन विभागांना अशी सूचना करण्यात येते की, दिनांक २६ फेब्रुवारी, १९८६ रोजी शासकीय कामकाज सुरळीत राहण्यासाठी व्यवस्था करण्याकरता शक्यतो कार्यालयापासून जवळ राहणाऱ्या अधिकाऱ्यांना नामनिर्देशित करावे. म्हणजे कार्यालय उघडणे व बंद करणे सोयीचे होईल.

[ प्र. द. भावे ]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-
शासनाचे सर्व सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग.